मानीव दिनांक मंजूर करणेबाबत.
श्री. प्रमोद कृ.देवकर, सह जिल्हा निबंधक, वर्ग-१

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन आदेश क्र. अस्थाप-२०२०/ प्र.क्र.६१/म-१
दालन क्र.म-७ अ, पोटमाळा, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार इमारत), मुंबई-४०० ०३२.
दिनांक- ०७ सप्टेंबर, २०२०

वाचाः- १) श्री. प्र.कृ. देवकर यांचा दिनांक २६/०५/२०२० चा अर्ज.
२) महसूल व वन विभाग,शासन आदेश क्र.आस्थापना-२०१३/१०४६/ प्र.क्र.२१४/ म-१, दि.०२.०५.२०१५.
३) महसूल व वन विभाग,शासन आदेश क्र.आस्थाप-२०१९/७६८/ प्र.क्र.५७/ म-१, दि.०१.०१.२०२०.
४) शासन निर्णय क्र.आस्थाप-२०१८/६७६/ प्र.क्र.७५/म-१,दि.२२.०५.२०२०.

प्रस्तावनाः-

श्री.प्रमोद देवकर यांची प्रथम नियुक्ती दुय्यम निबंधक श्रेणी-२ या पदावर दि.२९.०६.१९९३ रोजी झाली आहे. श्री. देवकर यांच्याविरूध्द मा. विशेष न्यायालय, पुणे यांचे न्यायालयात खटला दाखल करण्यात आला होता. सदर खटल्याचा निकाल दिनांक ०८.०२.२००५ रोजी झाला असून त्यामध्ये त्यांचेवर ठेवण्यात आलेल्या दोषारोपात त्यांना दोषी ठरविण्यात आले होते. सदर आदेशाविरूध्द श्री. देवकर यांनी मा. उच्च न्यायालयात अपिल दाखल केले होते. त्याचा निकाल दि.०७.०८.२००८ रोजी लागला असून त्यामध्ये मा. उच्च न्यायालयाने श्री. देवकर यांची निर्दोष मुक्तता केली आहे. श्री.देवकर यांना मा. उच्च न्यायालयाने दोषमुक्त केल्यामुळे त्यांना दुय्यम निबंधक श्रेणी-१ या संवर्गात दि.०१.१०.२००४ पासून समायोजित करण्यात आले. दरम्यानच्या कालावधीत दुय्यम निबंधक श्रेणी-२ या संवर्गातून दुय्यम निबंधक श्रेणी-१ या संवर्गात पदोन्नती देण्यात आली होती. दुय्यम निबंधक श्रेणी-२ (ज्ये.क्र.४) या संवर्गात सेवाकनिष्ठ असलेले श्री.आर.जी.मोतीराळे यांना दुय्यम निबंधक श्रेणी-१ या संवर्गात दि.०१.०१.२००२ रोजी पदोन्नती देण्यात आली होती. श्री. देवकर यांना मा. उच्च न्यायालयाने दोषमुक्त केल्यामुळे त्यांना श्री. मोतीराळे यांचा दुय्यम निबंधक श्रेणी-१ या संवर्गातील दि.०१.०१.२००२ हा पदोन्नतीचा मानीव दिनांक शासन ज्ञापन दि.०७.०८.२०१० अन्वये मंजूर करण्यात आला आहे. त्यानुसार दुय्यम निबंधक श्रेणी-१ संवर्गातील दि.०१.०१.२००५ च्या ज्येष्ठता यादीमध्ये अनुक्रमांक ६१ वरील श्री.मोतीराळे यांच्यावर म्हणजेच ६०अ वर श्री.देवकर यांची ज्येष्ठता निश्चित करण्यात आली आहे.

श्री. देवकर यांना दुय्यम निबंधक श्रेणी-१ या संवर्गातील मानीव दिनांक देण्यापूर्वी दुय्यम निबंधक श्रेणी-१ या संवर्गातून सह दुय्यम निबंधक वर्ग-२ या संवर्गात पदोन्नती देण्यात आली होती. सह दुय्यम निबंधक वर्ग-२ च्या पदोन्नती आदेशातील अ.क्र.४४ वरील श्री मोतीराळे हे दुय्यम निबंधक श्रेणी-१ या संवर्गात श्री. देवकर यांना सेवाकनिष्ठ असून देखील त्यांना पदोन्नती देण्यात आली होती. सबब, श्री.देवकर यांना सह दुय्यम निबंधक वर्ग-२ या संवर्गातील श्री. मोतीराळे यांचा पदोन्नतीचा दि.०१.०४.२००६ हा मानीव दिनांक देण्याची विनंती श्री. देवकर यांनी केली. त्यानुसार त्यांना शासन आदेश दि.१४.१२.२०१६ अन्वये श्री. मोतीराळे यांचा सह दुय्यम निबंधक वर्ग-२ या संवर्गातील पदोन्नतीचा दि.०१.०४.२००६ हा मानीव दिनांक मंजूर करण्यात आला आहे. त्यानुसार सह दुय्यम निबंधक वर्ग-२ या संवर्गाची ज्येष्ठता यादी दि.०१.०१.२००७ रोजी प्रसिध्द करण्यात आली असून सदर ज्येष्ठता यादीवर अ.क्र.६१अ वर श्री. देवकर यांच्या नावाचा समावेश करण्यात आला आहे.

दरम्यानच्या कालावधीत सह दुय्यम निबंधक वर्ग-२ या संवर्गातून पात्र अधिकाऱ्यांना सह जिल्हा निबंधक वर्ग-१ (नि.श्रे.) या संवर्गात पदोन्नती देण्यात आली आहे. सदर आदेशातील अ.क्र.१६ वरील श्री. डी. पी. सोनावणे हे श्री. देवकर यांना सेवा कनिष्ठ असून त्यांना सह जिल्हा निबंधक वर्ग-१(नि.श्रे.) या संवर्गात दि.०६.०९.२०११ रोजीच्या आदेशान्वये पदोन्नती देण्यात आली असून ते सदर पदावर दि.०९.०९.२०११ रोजी रूजू झाले आहेत. त्यानुसार

दिनांक ०१/०१/२०२० च्या शासन निर्णयान्वये श्री. देवकर यांना श्री. डी. पी. सोनावणे यांचा सह जिल्हा निबंधक, वर्ग-१ (निम्नश्रेणी) या पदावरील पदोन्नतीचा दिनांक ०९.०९.२०११ हा मंजूर करण्यात आला आहे.

महसूल व वन विभाग, शासन निर्णय दिनांक २२.५.२०२० च्या शासन निर्णयान्वये नोंदणी व मुद्रांक विभागातील सह जिल्हा निबंधक, वर्ग-१ (निम्नश्रेणी) व सह जिल्हा निबंधक, वर्ग-१ (उच्चश्रेणी) या संवर्गाचे एकत्रिकरण करण्यात आले आहे. या संवर्गात श्री. देवकर यांची ज्येष्ठता निश्चित करण्याच्या अनुषंगाने सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेनुसार श्री. देवकर यांना सेवाकनिष्ठ असलेले सन २०१४-१५ च्या निवडसूचीनुसार पदोन्नत झालेले श्री. डी. पी. सोनावणे, वर्ग-१ (उ.श्रे.) या संवर्गातील पदोन्नतीचा दिनांक ०२.०५.२०१५ मानीव दिनांक देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन आदेशः-</u>**

श्री.प्रमोद कृ.देवकर, सह जिल्हा निबंधक वर्ग-१ यांना सह जिल्हा निबंधक वर्ग-१ ( उच्चश्रेणी) या संवर्गात दिनांक ०२.०५.२०१५ हा पदोन्नतीचा मानीव दिनांक मंजूर करणे क्रमप्राप्त आहे. ही बाब विचारात घेता,सन २०१४-१५ च्या सह जिल्हा निबंधक वर्ग-१ (उच्चश्रेणी) या संवर्गामध्ये पदोन्नतीच्या निवडसूचीवर श्री.देवकर यांना नजिकचे सेवा कनिष्ठ असलेले श्री.डी.पी.सोनावणे यांचा सह जिल्हा निबंधक वर्ग-१ (उच्चश्रेणी) या पदावर पदोन्नतीने रुजू झाल्याचा दि. ०२.०५.२०१५ हा मानीव दिनांक देण्यास महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर मानीव दिनांक हा सेवाज्येष्ठता निश्चितीसाठी ग्राह्य धरण्यात यावा. श्री.देवकर यांना सह जिल्हा निबंधक,वर्ग-१(उच्चश्रेणी) या पदावरील मंजूर केलेला दि.०२.०५.२०१५ हा मानीव दिनांक ते दिनांक २२.५.२०२० च्या शासन निर्णयान्वये सह जिल्हा निबंधक, वर्ग-१ (निम्नश्रेणी) व सह जिल्हा निबंधक, वर्ग-१ (उच्चश्रेणी) या संवर्गाच्या एकत्रिकरणानंतर तयार झालेला सह जिल्हा निबंधक, वर्ग-१ या हा संवर्ग सदर शासन निर्णयाच्या अंमलबजावणीचा दिनांक म्हणजेच दिनांक ०१.०४.२०२० पासून अस्तित्वात आला असल्याने दिनांक ०२.०५.२०१५ ते दिनांक ०१.०४.२०२० या कालावधीतील काल्पनिक वेतननिश्चिती व काल्पनिक वेतन निश्चितीच्या अनुषंगाने त्यांना वेतन व भत्त्याच्या फरकाची रक्कम अनुज्ञेय राहणार नाही.

सदर आदेश सामान्य प्रशासन विभाग,अनौपचारिक संदर्भ क्र.३८८/का.१२,दि.२३.०७.२०२० व वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.१७६/२०/सेवा-३,दि.२०.०८.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९०८१२१८४७०४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Tanaji Dhondiram Saravane
Date: 2020.09.08 12:20:40 +05'30'

**( ता. धों. सरावणे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक,महाराष्ट्र राज्य,पुणे.

**प्रति,**

१. महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा),महाराष्ट्र राज्य ,मुंबई/नागपूर.

२. सर्व नोंदणी उपमहानिरीक्षक व मुद्रांक उपनियंत्रक कार्यालय.
३. संबंधित सह जिल्हा निबंधक,वर्ग-१ तथा मुद्रांक जिल्हाधिकारी.
४. संबंधित अधिकारी(नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक,पुणे यांच्यामार्फत)
५. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
६. अधिदान व लेका अधिकारी,मुंबई.
७. निवडनस्ती (म-१) ,महसूल व वन विभाग.